कोविड-१९ या आजाराच्या तिस-या लाटेच्या पुर्वतयारी व म्युकरमायकोसिस या आजाराकरीता बालरोगशास्त्र विभाग, कान नाक घसा शास्त्र विभागाकरीता आवश्यक असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर

महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : जीएचसी-२०२१/प्र.क्र.२७८/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१

दिनांक : ०७ जानेवारी, २०२२

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, चंद्रपूर यांचे पत्र क्र. निवि/का-१५/संस-१/जिवायो/प्र.मा.नि.वि./२१-२२/१००२,दि.२७.०५.२०२१
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ शावैमवरुचं /यंसाख/जिवायो/कोविड-१९/म/१००२६/२०२१, दि.२२.०७.२०२१
६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ शावैमवरुचं /यंसाख /जिवायो/कोविड-१९/म/१३०४५/२०२१, दि.२७.०९.२०२१
७) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/यंसाख/ शावैमरुचं/१५४३५/२०२१, दि.२३.१२.२०२१

शासन निर्णय :-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर या संस्थेस संदर्भाधीन दिनांक २३.१२.२०२१ च्या पत्रान्वये सन २०२१-२२ या वित्तीय जिल्हा वार्षिक योजनेंर्गत कोविड-१९ या आजाराच्या तिस-या लाटेच्या पुर्वतयारी व म्युकरमायकोसिस या आजाराकरीता बालरोगशास्त्र विभाग, कान नाक घसा शास्त्र विभागाकरीता आवश्यक असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्याकरीता मंजूर अनुदानातून यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय

मान्यतेकरीता प्रस्ताव सादर करण्याची विनंती संचालनालयाने केली होती. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने, खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार एकूण रुपये २,३६,४२,६०४/- (रुपये दोन कोटी, सत्तीस लक्ष, बेचाळीस हजार, सहाशे चार फक्त ) इतक्या रक्कमेच्या यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| ०१ | मायक्रोब्रायडर | ०१ | ९९९००० | ९९९००० |
| ०२ | एंडोस्कोप विथ कॅमेरा | ०१ | ९९०००० | ९९०००० |
| ०३ | फेस इन्ट्रुमेंट सेट | ०१ | ९६०००० | ९६०००० |
| ०४ | व्हेन्टीलेटर विथ ॲसेसरी (निओनेटल अँड पेडियाट्रिक) | ०६ | २५५३००० | १५३१८००० |
| ०५ | बबल सिपॅप | ०७ | ३९४१३२ | २७५८९२४ |
| ०६ | मल्टीपॅरा मॉनिटर | १० | १२७००८ | १२७००८० |
| ०७ | सिरिंज पंप / इन्फुजन पंप | १५ | २७४४० | ४११६०० |
| ०८ | टेबल टॉप पल्स ऑक्सीमाटर | २० | ४६७५० | ९३५००० |
| | | | एकूण | २,३६,४२,६०४ |

अटी :-

१. सदर संस्थेस जिल्हा वार्षिक योजनेंर्गत प्राप्त होणाऱ्या निधीच्या अधीन राहून प्रशासकीय प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्रीची सुधारीत नग संख्या याची खातरजमा संबंधित संस्था व संचालनालयाने केली आहे.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

७. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

८. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्तांनी खात्री करावी.

९. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

१०. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

१२. समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिद्ध करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१३. रुपये तीन लक्ष पेक्षा कमी किंमतीची तथापी एकापेक्षा अधिक संस्थांना आवश्यक असणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची मागणी एकत्रित करून अशा बाबींची खरेदी हाफकीन महामंडळामार्फत करण्यात येईल.

१४. संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपद्धतीनुसार करतांना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टल कार्यपद्धतीचा वापर करावा.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केलेल्या यंत्रसामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च सदर संस्थेस जिल्हा वार्षिक योजनेंर्गत प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

नियोजन विभाग मागणी क्रमांक ओ-६९

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०३ - वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन

| | | |
|---|---|---|
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| (५८) | - | जिल्हा योजना -चंद्रपूर |
| (५८) (०१) | - | रुग्णालयासाठी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे (कार्यक्रम) |
| (५२) | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० २८३२) |

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१०७१७०५२२५६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
Date: 2022.01.07 18:35:14 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

( सुधीर शेट्टी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन,मुंबई
२. महालेखाकार - २ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
४. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हाधिकारी नियोजन समिती, चंद्रपूर
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
६. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर .
८. निवडनस्ती (प्रशा-१).